महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान राहाता नगरपरिषदेच्या रस्ते विकास प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

### शासन निर्णय क्रमांकः नगरो-२०१४/प्र.क्र. ७८(३)/नवि-३३

मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२
तारीख: १४ ऑगस्ट,२०१४

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः एनयुआर-२००८/प्रक्र२०३/नवि-३३,दिनांक २०/०२/२०१०
२) नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे पत्र क्र. नपप्रस २०१३ /नगरोत्थान/बैठक दि.३०.५.१४/२०१४कक्ष १३,दि.२७/५/२०१४
३) दिनांक ३०/०५/२०१४ रोजी महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता व संनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) मुख्याधिकारी, राहाता नगरपरिषद यांचे पत्र क्र.जाक्र.वशि./ ८/१६४/ २०१४,दि.२३/ ०६/२०१४.
५) नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे पत्र क्र.संक्र.५३७९/राहाता/ २०१४/कक्ष१३, दि.१६/७/२०१४

प्रस्तावना

राज्यातील नागरी भागात शासनाने विहित केलेल्या मानकाप्रमाणे विविध मूलभूत पायाभूत नागरी सुविधा पुरविण्यासाठी व तेथे शहराच्या दर्जाप्रमाणे पायाभुत सुविधांची निर्मिती करुन शहराच्या सामाजिक सुविधा व सौंदर्य आकर्षणामध्ये वृध्दी करण्यासाठी सन २०१० पासून महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियान योजना राबविण्यात येत आहे.

२. मुख्याधिकारी,राहाता नगरपरिषद यांनी महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत रस्ते विकास प्रकल्पाच्या एकूण रुपये १३.५९६६ कोटी किंमतीच्या रस्ते विकास प्रकल्पास मान्यता देण्याची विनंती शासनास केली आहे.सदर प्रकल्पास मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,नाशिक यांनी दिनांक १०/२/२०१४ च्या पत्रान्वये तांत्रिक मान्यता दिलेली होती.त्याअनुषंगाने प्रस्ताव राज्यस्तरीय संनियंत्रणसमितीकडे प्रस्ताव सादर केला असता समितीच्या बैठकीत सार्वजनिक बांधकाम विभागाचे प्रतिनिधी यांनी सुचविलेल्या तांत्रिक सुधारणा करुन त्यास सक्षम प्राधिकाऱ्याने

तांत्रिक मान्यतेच्या अधीन प्रकल्पास मान्यता दिलेली होती.त्यानुसार प्रकल्प प्रस्तावात तांत्रिक सुधारणा केल्यानुसार मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,नाशिक यांनी तांत्रिक मान्यता दिल्याचे उपरोक्त संदर्भाधीन क्र.५ नुसार नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी पत्रान्वये कळविलेले आहे.

३. उपरोक्त बाबींचा विचार करता महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थाशन महाभियानांतर्गत राहता नगरपरिषदेच्या रस्ते विकास प्रकल्पास प्रशासकीय मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाअंतर्गत सादर करण्यात आलेल्या अहमदनगर जिल्हयातील राहाता नगरपरिषदेच्या रस्ते विकास प्रकल्पास खालीलप्रमाणे विवरणपत्रात नमूद केल्यानुसार प्रकल्प किंमतीस सिंकिंग फंडाची तरतूद करणे,अभियानांतर्गत नमूद सुधारणांची अंमलबजावणी करणे, योजनेवरील व आस्थापनेवरील खर्च कमी करणे,प्रकल्पाअंतर्गत समाविष्ट उपांगांसाठी आवश्यक जागा ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र सादर करणे,सदर प्रकल्पासाठी राज्य शासनाकडून वितरीत अनुदानाच्या प्रमाणात स्वहिस्सा जमा करणे,निविदा प्रसिध्द करण्यापूर्वी सदर प्रकल्पाकरिता संबंधित सक्षम प्राधिकारी यांची मान्यता घेणे या अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.राहाता नगरपरिषदेच्या मंजूर केलेल्या रस्ते विकास प्रकल्पातील योजनेतील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र | उपांगाचे नांव | अंदाजित रक्कम(रुपये) |
|---|---|---|
| १ | रस्ता क्र.२ मनमाड ते पिंपळस शिव आणि लोकरुचीनगर | २०९७६१८१.०० |
| २ | रस्ता क्र.४ शनी चौक ते कांपोझिट डेपोट (पिंपळवाडी रोड) | ३१०७७८८३.०० |
| ३ | रस्ता क्र.५ शनी चौक ते पुणतांबा रोड(नपावाडी रोड) | १९५९८३७९.०० |
| ४ | रस्ता क्र.८ कॅनॉल ते शिव रोड | १२५२६४२४.०० |
| ५ | रस्ता क्र.१४ चितळी रोड म्हसोबा मंदीर ते एकरुखे शिव | २५३२७२३५.०० |
| ६ | रस्ता क्र.१६ चितळी रोड ते रांजनगाव शिव आणि साई कॉलनी. | २६४५५८२६.०० |
| ७ | रस्ता क्र.१८ चरी.नं.१४ ते अस्तगाव शिव रोड. | २१२३०७०१.०० |

| अ.क्र | उपांगाचे नांव | अंदाजित रक्कम(रुपये) |
|---|---|---|
| | प्रकल्पाची किंमत | १५७१९२६२९.०० |
| | लेबर कॉंट्रॅक्ट(१ टक्के) | १५७१९२६.२९ |
| | इन्शुरन्स(१टक्के) | १५७१९२६.२९ |
| | कंटींजन्सी चार्जेस(३टक्के) | ४७१५७७८.८७ |
| | प्रकल्पाची एकूण किंमत | १६५०५२२६०.४५ |

२.राहाता नगरपरिषदेच्या मंजूर रस्ते विकास प्रकल्पाचा वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव व वर्ग | योजनेची किंमत | अनुज्ञेय अनुदान | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | राहाता<br>क वर्ग नगरपरिषद | रु. १६.५०५२ कोटी | रु. १३.२०४२ कोटी.<br>(८० टक्के) | रु. ३.३०१० कोटी<br>(२० टक्के) |

**३. राहाता नगरपरिषदेच्या रस्ते विकास प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे:-**

(१) महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानाच्या दिनांक २०/०२/२०१० रोजीच्या शासन निर्णयात नमूद सुधारणा(Reforms)ची अंमलबजावणी करणे नगरपरिषदेस बंधनकारक राहील.तसेच संदर्भ क्रमांक ३ येथील इतिवृत्तामध्ये नमूद अटी व शर्ती संबंधित नगरपरिषदेवर बंधनकारक राहील.

(२) सदर विकास कामांचे अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासकीय/निमशासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयाकडून तांत्रिक लेखापरिक्षण(Third Party Appraisal)करुन घ्यावे.तसेच दुसऱ्या हप्त्याचा निधी मागणीचा प्रस्ताव सादर करताना त्रयस्थ तांत्रिक लेखापरिक्षणबाबत विहित संस्थांकडून कामाची गुणवत्ता योग्य असल्याबाबत प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.तदनंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

(३) सदर प्रकल्पाकरिता नगरपरिषदेस२० टक्के हिस्सा भरावा लागणार आहे.त्याकरिता नगरपरिषदेने अंदाजपत्रकीय तरतूद करुन राज्य शासनाने वितरीत केलेल्या अनुदानाच्या प्रमाणात किमान हिस्सा जमा करण्यात येईल याची दक्षता घ्यावी तसेच सक्षम प्रधिकाऱ्याची/अधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेतल्यानंतरच निविदा काढाव्यात.

(४) प्रशासकीय मंजूर रकमेपेक्षा प्रकल्पाची किंमत वाढल्यास वाढीव खर्च भागविण्याची जबाबदारी संबंधित नगरपरिषदेची राहील.

(५) नगरपरिषदेनेसदर योजनेसाठी वित्तीय आकृतीबंधानुसार त्यांच्या आर्थिक सहभागापोटी निधी उभा करणे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहील.

(६) नगरपरिषदेने आर्थिक आराखडा (Financial Closure)जिल्हाधिकाऱ्यांना व संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना सादर करण्याची दक्षता घ्यावी.त्याशिवाय निविदा काढण्यात येउ नये.

(७) सदर योजना मंजुरीनंतर योजनेसाठी निश्चित केलेले उद्दिष्ट व त्याची कालमर्यादा लक्षात घेऊन नगरपरिषदेनेकृती आराखडा तयार करावा.

(८) महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान अभियानांतर्गत मंजूर होणाऱ्या प्रकल्पांसाठी राज्य शासनाकडून प्राप्त होणारे अनुदान तसेच नगरपरिषदेचा आर्थिक सहभाग नगरविकास विभागाच्या शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०११/प्रक्र.३१/नवि-४,दिनांक १९/०१/२०१२ नुसार पात्र असलेल्या बँकामध्ये स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

(९) महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानातंर्गत मंजूर होणाऱ्या प्रकल्पांवरील खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच लेखापरीक्षण सादर करणे नगरपरिषदेस अनिवार्य राहील

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१९११४४१३८५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Seema Pradeep Dhamdhere

Digitally signed by Seema Pradeep Dhamdhere
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Seema Pradeep Dhamdhere
Date: 2014.08.19 11:41:06 +05'30'

**(सीमा ढमढेरे)**

**सह सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. मा.मंत्री सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
५. मा.अपर मुख्य सचिव(नियोजन) यांचे स्वीय सहायक

६. मा.अपर मुख्य सचिव(वित्त) यांचे स्वीय सहायक
७. प्रधान सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक
८. प्रधान सचिव नगरविकास -२ यांचे स्वीय सहायक
९. व्यवस्थापकीय संचालक,एम.यु.आय.डी.सी.एल.
१०. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,नाशिक
११. आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई
१२. विभागीय आयुक्त,नाशिक विभाग,नाशिक
१३. जिल्हाधिकारी,अहमदनगर.
१४. जिल्हा प्रकल्प अधिकारी,अहमदनगर
१५. मुख्याधिकारी,राहाता नगरपरिषद जि.अहमदनगर.
१६. निवडनस्ती (नवि-३३)